**महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांचेकडील ६ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०२.१७/प्र.क्र.५४/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ मार्च, २०१७

**वाचावे :-**

१. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक डब्ल्युएलपी ०१.१६/प्र.क्र.३२/फ-१ दि.२४.०५.२०१६
२. शासन निर्णय , महसूल व वन विभाग क्रमांक डब्ल्युएलपी ०१.१६/प्र.क्र.०३/फ-१ दि.१३.१०.२०१६
३. शासन निर्णय , महसूल व वन विभाग क्रमांक डब्ल्युएलपी ०१.१६/प्र.क्र.०८/फ-१ दि.१३.१०.२०१६
४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि. १०.०२.२०१७
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-३/योजनेतर/प्र.क्र.८८-A/२०१६-१७/२३७७, दि.१६.०३.२०१७
६. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक डब्ल्युएलपी ०२.१६/प्र.क्र.४८/फ-१ दि.२२.०३.२०१७

**शासन निर्णय :-**

जैव विविधता संवर्धन कार्यक्रमांतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १७६ अस्थायी पदांना संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.१०.२०१६ ते दिनांक २८.०२.२०१७ पर्यत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजूरी प्रदान करण्यात आली आहे. त्यापैकी ५ अस्थायी पदे महाराष्ट्र राज्य निसर्ग पर्यटन विकास मंडळाकडे तर ११ पदे राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाकडे वर्ग करण्यात आली आहेत. उर्वरीत १६० पदांना दि. ०१.०३.२०१७ ते ३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत संदर्भ क्रमांक ६ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान करण्यात आली आहे. राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाकडे वर्ग करण्यात आलेल्या पदांना मुदतवाढ देण्याबाबत शासन निर्णय अलाहिदा जारी करण्यात येत आहे. तसेच मेळघाट व्याघ्र प्रकल्पांतर्गत कार्यरत असलेले विभागीय वन अधिकारी (निसर्ग निर्वचन वन्यजीव) ह्या अस्थायी पदास संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.१०.२०१६ ते दिनांक २८.०२.२०१७ पर्यत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजूरी प्रदान करण्यात आली आहे. सदर पद आता महाराष्ट्र राज्य निसर्ग पर्यटन विकास मंडळाकडे वर्ग करण्यात आले आहे.

२. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार शासन निर्णय संदर्भ क्र. ४ अन्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत.

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक हे पद संपुष्टात आल्याने सदर कार्यालयातील पदे मंडळ / प्राधिकरण यांचकडे समायोजित / वर्ग करण्यात आली आहेत. त्यामुळे नाशिक वनवृत्तातील मुख्य लेखापाल-१, लेखापाल-१, प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) या कार्यालयातील व्यवस्थापकीय संचालक-१, लघुलेखक-१ (उच्चश्रेणी) व वाहनचालक-१ अशी एकूण ५ अस्थायी पदे तसेच मेळघाट व्याघ्र प्रकल्पांतर्गत कार्यरत असलेले विभागीय वन अधिकारी, ( निसर्ग निर्वचन वन्यजीव) हे अस्थायी १ पद अशी **एकूण ६ पदे** महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांना उपलब्ध करून देण्यात आलेली आहेत.

४. प्रशासकीय विभागाच्या नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांच्या आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) कोणत्याही परिस्थितीत **३० एप्रिल, २०१७ अखेरपर्यंत** उच्च स्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याच्या अटीवर महाराष्ट्र राज्य निसर्ग पर्यटन विकास मंडळ योजनेखाली वर्ग करण्यात आलेल्या ६ अस्थायी पदांना **दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत** पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळास संदर्भीय शासन निर्णय क्रमांक १ अन्वये नवीन लेखाशीर्ष उपलब्ध करुन देण्यात आले आहे. त्यामुळे सदर ६ पदांच्या आस्थापनेसाठी लागणारा खर्च ०२, पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण, (००) (२०) महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळाची स्थापना (२४०६ A०९६ ) या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणा-या तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४, क्रमांक:- पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/विसु-१, दिनांक ११.०२.२०१६ व क्रमांक:- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक २१.०९.२०१६ व क्र. क्रमांक:- पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क ,दिनांक १०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२४१५५७४४७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, serialNumber=2972090f5c611c22111cacebf1c55ba326016fa7107614a6b256203dbb7235cd, cn=Arvind Shankar Apte
Date: 2017.03.24 15:58:59 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर/पश्चिम मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर
५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
६. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

*****

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी ०२.१७/प्र.क्र.५४/फ-१ दिनांक :-२४ मार्च, २०१७ सोबतचे विवरणपत्र.**

**(दिनांक ०१.०३.२०१७ ते ३०.०९.२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | एकूण अस्थायी पदे |
|---|---|---|
| १ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर ( मुख्य वनसंरक्षक दर्जा ) | १ |
| २ | विभागीय वन अधिकारी, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर | १ |
| ३ | मुख्य लेखापाल | १ |
| ४ | लेखापाल | १ |
| ५ | लघुलेखक | १ |
| ६ | वाहन चालक | १ |
| | **एकूण** | ६ |

********